**महाराष्ट्र संशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत), या कार्यालयाकरिता वर्ल्ड ट्रेड सेंटर, कफ परेड, मुंबई येथील जागा भाडेतत्वावर घेण्यासाठी मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहूजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्र. अमृत २०२१/ प्र.क्र. ५१/ संस्था**
**मंत्रालय (विस्तार), दालन क्र. १३९,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२**
**दि. २२.१२.२०२१**

संदर्भ:-

१. जागतिक व्यापार केंद्र, मुंबई यांचा दि. १३.१२.२०२१ रोजीचा प्रस्ताव
२. अमृत संस्थेचा दि. २२.१२.२०२१ रोजीचा ई- मेलद्वारे प्राप्त प्रस्ताव.
३. शासन पत्र समक्रमांक दि. २०.१२.२०२१ व ई ऑफीस - ५५४६१६, दि. १४.१२.२०२१ रोजीचे वर्क ऑर्डर .

**प्रस्तावना-**

खुल्या प्रवर्गातील आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील विद्यार्थी, युवक- युवती व इतर उमेदवारांकरिता विविध उपक्रम, कार्यक्रम इ. राबविण्यात येऊन तसेच इतर माध्यमांतूनही त्यांचा विकास घडविण्यासाठी महाराष्ट्र संशोधन उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) या संस्थेची दि. २२.०८.२०१९ रोजी स्थापना करण्यात आली असून सदर संस्थेचे मुंबई येथील कार्यालयाकरिता जागा भाडेतत्वावर घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र संशोधन उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) या संस्थेचे कामकाज सुरु करण्याकरिता जागतिक व्यापार केंद्र, मुंबई या इमारतीतील Tulip व Orchid येथे पहिल्या मजल्यावरील जागा एकूण ६६० चौ. फु. इतकी जागा १ वर्षाकरिता भाडेतत्वावर आरक्षित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्र. ०३ झेडजी-२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, १०२ आर्थिक विकास,(१०) “महाराष्ट्र संशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी” (अमृत) (२२२५-एफ-५३२) या लेखाशिर्षाखाली २०२१-२२ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११२२३१३३२२८०९२२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

VARSHA SUNIL SAMANT

Digitally signed by VARSHA SUNIL SAMANT
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=OTHER BACKWARD BAHUJAN KALYAN DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=765dae4fef3315c4544a15270edc443fbacf630172f5e6b732d16b64198d81ba, serialNumber=af4e3a3aadaca1026547ef614df4de89d66994806d3760116b32bb3aadeaf9fb, cn=VARSHA SUNIL SAMANT
Date: 2021.12.23 13:33:29 +05'30'

**( वर्षा सामंत )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महाराष्ट्र संशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) संस्था, मुंबई
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) ½, महाराष्ट्र मुंबई/नागपूर
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)१/२, महाराष्ट्र राज्य मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी , मुंबई
६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ७. निवडनस्ती.